**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या विविध कल्याणकारी योजनांच्या प्रभावी प्रसिध्दीकरिता जाहिरातीसाठी मंडळाच्या सन २०१४-१५ च्या अंदाजपत्रकात रु.१५ कोटीची वाढीव तरतूद करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांक: इबांका २०१४/५६७/प्र.क्र.१७६/काम-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ ऑगस्ट,२०१४.

वाचा १)कामगार आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.काआ/इवइबाकाकम/२०१४/१५०१, दि.०७.०८.२०१४.
२) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १४ ऑगस्ट,२०१४.
३) कामगार आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.काआ/इवइबाकाकम/२०१४/१५८७, दि.१६.०८.२०१४.

## शासन निर्णय शुध्दीपत्रक

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या कल्याणकारी योजनांच्या जाहिरातींकरिता महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ,मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानुसार रु.१५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी फक्त ) एवढा वाढीव खर्च करण्यास संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णय समक्रमांक दि.१४.०८.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील अट क्र. २ मध्ये पुढीलप्रमाणे दुरुस्ती करण्यात येत आहे.

२. जाहिरातीकरिता माध्यमनिहाय खर्च खालीलप्रमाणे राहील-

अ) ग्रामपंचायत कार्यालयातील माहिती फलक - ६ कोटी.
ब) एस.टी.बसेसवरील साईड व बॅक पॅनल जाहिराती - ३ कोटी.
क) बेस्ट बसेसवरील साईड व बॅक पॅनल जाहिराती - २ कोटी.
ड) लोकल ट्रेनमधील (मध्य व हार्बर रेल्वे ) एल.सी.डी. डिस्प्ले वरील जाहिराती - १ कोटी.

ई) एस.टी.स्थानकावरील ध्वनीक्षेपावरील (ऑडिओ) जाहिराती - २ कोटी.

फ) वर्तमानपत्रातील जाहिराती - १ कोटी.

२. प्रस्तुत प्रकरणी कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ,मुंबई यांनी नियमानुसार पुढील आवश्यक कार्यवाही करावी तसेच प्रकरणात कोणतीही अनियमितता होणार नाही याबाबत सर्वतोपरी दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahrashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८२११५०१५४१८१० असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2014.08.21 15:00:13 +05'30'

( दि.सो.राजपूत )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,

२) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक,

३) उप सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक,

४) कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई,

५) महालेखापाल(लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,

६) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,

८) निवडनस्ती (कामगार ७).